# अधिसूचना

सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : ३० सप्टेंबर १९९३.

भारताचे संविधान.

क्रमांक टलेप्र-१०८१/सीआर/३४४/वीस-ब - भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, महाराष्ट्र नागरी सेवा [इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांच्यासाठी सक्तीची मराठी लघुलेखन व मराठी टंकलेखन परीक्षा] नियमावली १९९१ यांत सुधारणा करण्यासाठी याद्वारे पुढील नियम करीत आहेत :-

१. या नियमास महाराष्ट्र नागरी सेवा [इंग्रजी लघुलेखन व इंग्रजी टंकलेखक यांच्यासाठी सक्तीची मराठी लघुलेखन व मराठी टंकलेखन परीक्षा][सुधारणा] नियमावली, १९९३ असे म्हणता येईल.

२. महाराष्ट्र नागरी सेवा [इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांच्यासाठी सक्तीची मराठी लघुलेखन व मराठी टंकलेखन परीक्षा] नियमावली १९९१ [यात यापुढे जिचा उल्लेख "मुख्य नियमावली" असा केला आहे] च्या नियम ६ मधील पोटनियम [दोन]मध्ये "१५ जुलै"या मूळ मजकुराऐवजी "१५ ऑगस्ट" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

३. मुख्य नियमावलीच्या नियम ९ नंतर पुढील नियम समाविष्ट करण्यात येईल आणि तो नेहमीसाठी समाविष्ट करण्यात आला असल्याचे समजण्यात येईल.

"९अ. या नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, ऑक्टोबर १९९१ मध्ये घेण्यात आलेल्या परीक्षेत जो उत्तीर्ण झाला आहे असा प्रत्येक इंग्रजी लघुलेखक किंवा इंग्रजी टंकलेखक विद्यमान प्रशिक्षण योजनेनुसार मिळणा-या लाभास पात्र असण्याचे चालू राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[सही/-
[अ.व. आम्बेरकर]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

क्रमांक : टलेप्र-१०८१/सीआर/३४४/२०-ब,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर १९९३.

प्रत माहितीसाठी सादर अग्रेषित,

१. राज्यपाल यांचे सचिव,
२. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

...